**माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ करिताच्या बोधचिन्हा (LOGO ) बाबत**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
शासन परिपत्रक क्रमांक - केमाअ २०११ /४०८/प्र.क्र.२२९/११/सहा,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - २२/११/२०११.

**परिपत्रक :-**

माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ करिता केंद्र शासनाने " बोधचिन्ह " (LOGO) तयार केलेले आहे ( सोबत झेरॉक्स प्रत जोडली आहे ) हे बोधचिन्ह सर्व शासकीय कार्यालयात/ सार्वजनिक प्राधिकरणात जेथे कार्यालयीन टपाल स्वीकारले जाते तेथे ठळकपणे दृष्टीपथास पडेल अशा ठिकाणी प्रदर्शित करावयाचे आहे तसेच ते शासनाच्या सर्व प्रकारच्या लेखन सामुग्रीवर प्रादेशिक मराठी भाषेत छापून घेणे आवश्यक आहे.

२. माहितीचा अधिकार अधिनियम, २००५ च्या बोधचिन्हाचा (LOGO) वापर कसा करावा याबाबतच्या मार्गदर्शक सूचना केंद्रशासनाच्या www. rtigateway.org.in हया संकेतस्थळावर तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या gad.maharashtra.gov.in हया संकेतस्थळावरही उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आहेत.

३. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, मंत्रालयीन विभागामध्ये तसेच त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालयांच्या व संबंधित सार्वजनिक प्राधिकरणांच्या ठिकाणी हे बोधचिन्ह प्रदर्शित करण्याबाबत तसेच सर्व शासकीय सामुग्रीवरही छापून घेण्याबाबत सूचना देण्यात याव्यात. याची काटेकोरपणे अंमलबजावणी करुन अनुपालन अहवाल या विभागास तात्काळ सादर करण्यात यावा.

४. हे परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या wwwmaharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१११२२१११४१४००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**( नंदकुमार जंत्रे )**
**सचिव ( प्र.सु.व र.व का. )**

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई

मा.मुख्यमंत्री/ मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/ सचिव
सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी
सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव /सचिव, मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, चर्नीरोड, मुंबई, नागपूर, औरंगाबाद, पुणे
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता )-१ महाराष्ट्र , मुंबई
महालेखापाल ( लेखा परिक्षा-१, महाराष्ट्र, मुंबई
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
निवडनस्ती कार्यासन -सहा

